कोषागारातून रोख देय अनुदान

सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी जिल्हा परिषद पंचायत समित्यांच्या प्रशासकीय व निवासी इमारतीच्या बांधकामास सहाय्यक अनुदान ( लेखाशिर्ष-२५१५ ००५३-योजनांतर्गत)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्रमांक: योजना २००९/ प्र.क्र.७८ /पंरा -७
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-३१ जुलै, २००९.

वाचा :- १. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अंदाज १०.०९/सीआर/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक २३.३.२००९.
२. शासन पत्र , ग्रामविकास व ज. सं. विभाग, क्र.बीजीटी १००९/प्र.क्र.३०/वित्त-१, दिनांक १२.६.२००९

शासन निर्णय :-

सन २००९-२०१० या वित्तीय वर्षाच्या पहिल्या चार महिन्यांच्या कालावधीत अंमलबजावणी खालील योजना पुढे चालू ठेवण्यासाठी महाराष्ट्र विधान मंडळाने "महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक २००९" मंजूर केले असून, ते महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ९ म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक २३ मार्च २००९ मध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. त्यानुसार जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांच्या प्रशासकीय व निवासी इमारतींच्या बांधकामासाठी चार महिन्याच्या कालावधीसाठी उपलब्ध झालेल्या रुपये १५६६.५० लक्ष अर्थसंकल्पिय तरतूदीतून माहे जून,०९ च्या कॅश-फ्लो प्रमाणे एकूण रु.१०००.०० लक्ष इतके सहाय्यक अनुदान समक्रमांकाच्या दिनांक ३०जून,२००९ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदांना वितरीत करण्यात आले आहे.

२. आता, वित्त विभागाच्या संदर्भीय अ.क्र.१ वरील दिनांक २३मार्च,२००९ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या वितरणाच्या अधिकाराच्या विहित मर्यादेच्या अधीन राहून व जिल्हा परिषदांची मागणी विचारात घेवून, जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांच्या इमारतींच्या बांधकामासाठी माहे जुलै,०९ च्या कॅश-फ्लो प्रमाणे एकूण रक्कम रु.५६६.५० लक्ष (अक्षरी रुपये पाच कोटी सहासष्ट लक्ष पंन्नास हजार फक्त) इतके सहायक अनुदान माहे जुलै,२००९ मध्ये मंजूर करुन, संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ. क्र | जिल्हा परिषद / पंचायत समितीचे नाव | माहे जुलै,०९ साठी वितरीत करण्यात आलेला निधी (रुपये-लक्ष मध्ये) |
|---|---|---|
| 1 | 2 | 3 |
| (अ) मराठवाडा | | |
| १ | पं.स. सोनपेठ, जि.परभणी | ६०.०३ |
| २ | पं.स. मानवत, जि.परभणी | ६०.०३ |
| | एकूण | १२०.०६ |
| (ब) विदर्भ | | |
| १ | जिल्हा परिषद गोंदीया | १००.७४ |
| २ | पं.स. पोंभूर्णा, जि.चंद्रपूर | ९५.५१ |
| | एकूण | १९६.२५ |
| (क) उर्वरीत महाराष्ट्र | | |
| १ | जिल्हा परिषद नंदूरबार | ९९.०० |
| २ | पं.स.माळशिरस, जि.सोलापूर | १००.१९ |
| ३ | पं.स.अक्कलकोट, जि.सोलापूर | ५१.०० |
| | एकूण | २५०.१९ |
| एकूण (अ)+(ब)+(क) | | ५६६.५० |
| | | (अक्षरी रुपये पाचशे सहासष्ट लक्ष पन्नास हजार फक्त) |

३. या करीता होणारा खर्च मागणी क्र. एल-३ "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१-पंचायत राज, ३१-सहायक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३) (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० साठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. माहे जुलै,२००९ या महिन्यांसाठी उपलब्ध करुन दिलेला निधी त्याच कारणांसाठी तात्काळ खर्च करुन, सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल, संबंधीत विभागीय आयुक्त व या विभागाकडे तात्काळ पाठविण्याची जबाबदारी संबधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

५. प्रस्तुतचा शासन निर्णय शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अंदाज १०.०९/सीआर/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक २३ मार्च २००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध असून, त्याचा सांकेतांक क्र. २००९०७३११३१८३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

( चंद्रकांत ह.वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. विभागीय आयुक्त, पुणे, औरंगाबाद, नागपूर,
२. महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा, महाराष्ट्र - १ मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद- परभणी, गोंदीया, चंद्रपूर,नंदूरबार व सोलापूर,
४. कार्यकारी अभियंता (बांधकाम),जि.प., परभणी, गोंदीया, चंद्रपूर,नंदूरबार व सोलापूर,
५. गटविकास अधिकारी, पं.स., सोनपेठ,मानवत(परभणी), पोंभूर्णा(चंद्रपूर), माळशिरस व अक्कलकोट (सोलापूर),
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जि.प. परभणी, गोंदीया, चंद्रपूर,नंदूरबार व सोलापूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.प. परभणी, गोंदीया, चंद्रपूर,नंदूरबार व सोलापूर,
८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
९. उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, परभणी, गोंदीया, चंद्रपूर,नंदूरबार व सोलापूर,
१०. वित्त विभाग, (व्यय १५/ अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबइ ४०० ०३२.
१२. कार्यासन, वित्त-१, वित्त-७ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती कार्यासन क्रमांक पं.रा.७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.